साहित्य प्रतिष्ठान

Poetअक्षरी



# स्वामी विवेकानंद

*The Known Philosopher*

*The Unknown Poet*

**अतिथी संपादक**

कपिल चंद्रायन (नागपूर)

**यजमान संपादक**

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

**संपादक मंडळ**

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (ठाणे)

सारंग भणगे (पुणे)

# नेटाक्षरी

अंक क्र.१०३

**आज ४ जुलै.स्वामी विवेकानंदांची पुण्यतिथी.**
**त्यांच्या स्मृतीला ई साहित्य प्रतिष्ठानचे विनम्र अभिवादन.**
**नेटाक्षरीचा हा आदरांजलीपर अंक..**



## ह्या अंकात वाचा

**स्वामीजी -**

एका प्रकाशगोलावर
कपिल चंद्रायन ह्यांचा
प्रकाशझोत

**विवेकवाणी -**

स्वामी विवेकानंदांच्या
कवितांचा स्वप्ना कोल्हे
ह्यांनी केलेला भावानुवाद

*नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी* - netaksharee@gmail.com

# स्वामीजी

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ।।

श्रीमद भगवद गीतेतील दुसऱ्या अध्यायातील ३७ व्या श्लोकात भगवान श्रीकृष्णांनी विषण्ण झालेल्या अर्जुनाला उत्तिष्ठ असा आदेश केलेला आहे.खरे तर हा आदेश केवळ अर्जुन नावाच्या व्यक्तीला नसून आपल्यातील प्रत्येकाकरीता आहे.स्वार्थ व मोहाने ग्रासलेल्या अर्जुनाचे प्रतिबिंब कमी जास्त प्रमाणात आपणा सर्वांमध्ये विद्यमान आहे.यामुळे समाजात अत्याचार,अनाचार वाढतो आहे व धर्माची ग्लानी होते आहे.महाभारत काळात जेव्हा ही स्थिती होती त्यावेळी भगवंतांनी श्रीकृष्ण रुपात अवतार घेऊन पांडवांच्या माध्यमाने धर्मग्लानि दूर करुन सत्य धर्म स्थापना केली.

आज ज्याला आपण कलियुग म्हणतो त्या युगात देखील स्थिती फारशी वेगळी नाही.मध्ययुगापासून भारतावर आक्रमणांवर आक्रमणे झालीत.मोगल,फ्रेंच,इंग्रज ह्या सर्वांनी भारतातील राजकीय सत्ता हस्तगत केली व त्यामुळे सनातन भारतीय धर्माला ग्लानी येऊ लागली.इंग्रजांनी तर आपल्या संस्कृतीच्या मुळावर म्हणजेच आपल्या शिक्षण पध्दतीवर हल्ला केला.परिणाम असा झाला की आम्ही विविध विद्या पारंगत तर झालो पण आमचा स्वाभिमान,परस्पर स्नेह व देशाभिमान आम्ही गमावून बसलो.ज्याप्रमाणे भगवान श्रीकृष्णाने अर्जुनातला क्षात्रधर्म जागृत केला व त्यायोगे धर्मस्थापना केली त्याचप्रमाणे आधुनिक भारतातील राष्ट्रधर्म जागृत करण्याचे काम स्वामी विवेकानंदांनी केले.

स्वामी विवेकानंदांचा जन्म १२ जानेवारी १८६३ मध्ये मकर संक्रांतीच्या शुभ मुहूर्तावर कलकत्त्यातील सिमुलिया मोहल्ल्यात दत्त कुटूंबात झाला.संक्रमण काळी जन्मलेल्या ह्या बालकाने जणू पुढे होणाऱ्या राष्ट्र संक्रमणाचे सुतोवाचच केले.बालपणी स्वामीजींचे नाव होते नरेंद्र विश्वनाथ दत्त.बालपणापासून सत्य बोलणे व त्याप्रमाणे वागणे हा स्वामीजींचा स्थायीभाव होता.त्यांचे वडील मोठे वकील होते व त्यांच्याकडे वेगवेगळ्या जाती जमातींचे लोक मार्गदर्शनाकरीता येत असत.त्याकाळाच्या रितीप्रमाणे बैठकीत वेगवेगळ्या जातींच्या लोकांकरीता वेगवेगळे हुक्के ठेवलेले असायचे.बाल नरेंद्रला ह्या गोष्टींचे मोठे कुतूहल वाटायचे.कुतूहलापोटी त्यांनी त्या सर्व हुक्क्यांना ओढून पाहिले व शेवटी आपल्या वडिलांना म्हणाले,जर सर्व हुक्क्यांमध्ये एकच तंबाखू आहे तर केवळ जातीभेदामुळे प्रत्येकाला वेगळा हुक्का का ? ह्या स्वाभाविक प्रश्नातून स्वामीजींनी जाती प्रथेविरुध्द युध्दाचा शंखनाद केला.पुढे त्यांच्या संन्यस्थ जीवनात अनेकदा कधी भाषणातून तर कधी कृतीतून त्यांनी ह्या जातीव्यवस्थेवर आघात केले.स्वामीजी म्हणत,भारताला जर जगद्गुरु पदाला पोहचायचे असेल तर आपल्याला प्रथम जातीव्यवस्थेला दूर केले पाहिजे.स्वामीजींच्या ह्याच विचारांचे योग्य प्रकारे कृतीत रुपांतर करणे काळाची नितांत गरज आहे.

लहानपणापासून अध्यात्माची आवड असलेल्या नरेंद्रला ईश्वरप्राप्तीची ओढ लागली ती तारुण्यात.नरेंद्र त्या काळातील अनेक संत पुरुषांकडे जाऊन त्यांना थेट प्रश्न विचारीत असे की,तुम्ही देवाला पाहिले आहे का?एका लहानग्याने निर्भीडपणे विचारलेल्या अशा प्रश्नामुळे अनेक साधू संतांची झालेली केविलवाणी स्थिती ,त्यांची खरी योग्यता नरेंद्रच्या लक्षात येत असे.अशा प्रकारे अनेक ठिकाणी अयशस्वी झाल्यानंतरही नरेंद्रची ईश्वर दर्शनाची ओढ काही कमी झाली नव्हती.एके दिवशी त्याची भेट दक्षिणेश्वर काली मंदिराचे पुजारी व ज्यांनी सर्व धर्मांची व संप्रदायांची साधना पूर्ण करुन ईश्वर एक आहे हे सत्य प्रकाशित केले अशा भगवान श्री रामकृष्ण परमहंस ह्यांच्याशी झाली.नरेंद्रने तोच प्रश्न परमहंसांना विचारला व त्यांनी हसून उत्तर दिले,'होय मी ईश्वराला पाहिले आहे.अगदी तुला पाहतोय तसा किंबहुना त्याहूनही अधिक जवळून'.नरेंद्रला सद्गुरु मिळाले,गंगा सागरास मिळाली.रामकृष्णांच्या सान्निध्यात नरेंद्रामध्ये अनेक बदल झाले.परीसस्पर्शाने पोलादाचे सोने होऊ लागले.साधनेमुळे नरेंद्रला ध्यान व समाधी प्राप्त होऊ लागली.नरेंद्र हळूहळू निजानंदात रमायला लागला.अशा वेळेस गुरुंची आज्ञा झाली,'स्वतःसाठी नाही इतरांसाठी जग.उपदेश झाला जीव सेवा हीच शिव सेवा'.

नरेंद्रने आपल्या घरीच शिक्षणाची सुरुवात केली.नंतर १८८४ मध्ये ते बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले.पाश्चात्य तत्वज्ञानासोबतच त्यांनी प्राचीन संस्कृत,बंगाली ग्रंथाचाही अभ्यास केला होता.त्यांना 'श्रुतिधारा' म्हणजेच विलक्षण स्मरणशक्ती असलेला म्हटले जात असे.

परमहंसांच्या महासमाधी नंतर स्वामी विवेकानंदांनी (आपण आता युवा नरेंद्रला विवेकानंद म्हणूयात) दरिद्रनारायणाची सेवा हेच व्रत घेतले.आपल्या देशाची खरी स्थिती काय आहे हे जाणून घेण्याकरीता स्वामीजींनी परिव्राजक बनून भारतभ्रमण सुरु केले.काश्मिर ते कन्याकुमारी पायी व गाडीने प्रवास केला व भारत मातेचे वेगवेगळ्या रुपात दर्शन घेतले.त्यांचा हा प्रवास किती खडतर पण विचारसमृध्द बनवणारा होता हे त्यांनी एके ठिकाणी नमूद केलेले आहे,ते म्हणतात..Many times I have been in the jaws of death, starving, footsore, and weary; for days and days I had no food, and often could walk no further; I would sink down under a tree, and life would seem to be ebbing away. I could not speak, I could scarcely think, but at last the mind reverted to the idea: "I have no fear, nor death; never was I born, never did I die; I never hunger or thirst. I am It! I am It! The whole of nature cannot crush me; it is my servant. Assert thy strength, thou Lord of lords and God of gods! Regain thy lost empire! Arise and walk and stop not!" And I would rise up, reinvigorated; and here I am today, living! Thus, whenever darkness comes, assert the reality and everything adverse must vanish. For after all, it is but a dream. Mountain-high though the difficulties appear, terrible and gloomy though all things seem, they are but Maya. Fear not, and it is banished. Crush it, and it vanishes. Stamp upon it, and it dies.

अज्ञान,दारिद्र्य व अत्याचाराचे राज्य बघून स्वामीजी व्यथित झाले व कन्याकुमारीला समुद्रातील शिलेवर ध्यानस्थ बसले.ध्यानात त्यांना लोकशिक्षण कर असा आदेश मिळाला.भावी योजनांची आखणी करत स्वामीजी पुढे निघाले तोच त्यांना शिकागो येथे होणाऱ्या सर्वधर्म परिषदेस निमंत्रण मिळाले.भगवान श्रीरामकृष्ण व माता शारदादेवी ह्यांच्या आशिर्वादाने स्वामीजी शिकागोला पोहचले.अनेक अडथळे व अडचणींनंतर त्यांना सभेत प्रवेश मिळाला.भारतासारख्या सामर्थ्यहीन व दरिद्री देशातील संन्यासी आम्हाला काय सांगणार ? बहुधा हीच भावना सभेच्या आयोजकांच्या मनात होती पण आपल्या अकृत्रिम स्नेहाने,अजस्त्र ज्ञानाने व ओजस्वी वाणीने स्वामीजींनी सभेला मंत्रमुग्ध करुन टाकले. त्या परिषदेत त्यांनी 'अमेरिकेतील माझ्या बंधु आणि भगिनींनो' अशी भाषणास सुरुवात केली आणि सभागृहात टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.सर्वात प्राचीन असणाऱ्या वेदिक परंपरेच्या वतीने,जिने जगाला सहिष्णुता व वैश्विकतेचा स्वीकार करण्याची शिकवण दिली आहे,मी जगातील नवनिर्मित राष्ट्रांचे स्वागत करतो या शब्दांत त्यांनी आपले व्याख्यान पुढे चालू केले.आपल्या सुंदर वक्तृत्वाने त्यांनी विश्वधर्म परिषदेचे प्राणच विषद केले.आपल्या विचारांनी त्यांनी अमेरिकन वर्तमानपत्रांचे लक्ष वेधून घेतले.त्यांनी स्वामीजींचे वर्णन भारतातून आलेला एक वादळी व्यक्तिमत्वाचा सन्यासी असे केले.पुढे वेदांत आणि योग ह्या विषयावर स्वामीजींनी अमेरिका,इंग्लंड व इतर युरोपीय देशांत व्याख्याने दिलीत.

अमेरिका व युरोप मध्ये सनातन भारतीय धर्माची विजय पताका फडकावून स्वामीजी भारतात परतले.परतल्यावर त्यांनी भारतात अनेक ठिकाणी व्याख्याने दिलीत.त्या व्याख्यानांमध्ये स्वामीजींनी राष्ट्रवाद,मनुष्यनिर्माण व निष्काम कर्मावर महत्वाचे मार्गदर्शन केले.स्वामीजींच्या मार्गदर्शनामुळे राष्ट्रवादाची व राष्ट्रभिमानाची भावना जनमानसात जागृत झाली.त्यामुळे स्वातंत्र्य संग्रामाला शक्ती मिळाली.अमेरिका व युरोप सारख्या देशांना भारताची महती कळाली.भारतीय तरुणांना केलेल्या आवाहनामुळे भारतातील तरुण जागृत होऊ लागले.त्यामुळे ग्लानीग्रस्त अंधकार दूर होऊन भारतात नवचैतन्याचा सूर्योदय होऊ लागला.

स्वामीजी म्हणाले होते की,मला १०० निष्काम तरुण द्या,मी भारताला जगदगुरु बनवून दाखवतो.त्या मार्गावर स्वामीजींनी रामकृष्ण मिशन व आश्रम ह्या माध्यमातून मनुष्यनिर्माणाचे महान कार्य सुरु केले.हे कार्य सुरु असतांनाच कलकत्याजवळील बेलूर मठात ४ जुलै १९०२ रोजी रात्री ९ वाजून १० मिनीटांनी त्यांनी आपले भौतिक शरीर त्यागले,त्यांनी समाधी घेतली व ते निजानंदात रममाण झाले आणि ४० वर्षांपर्यंत आपण जगू ही स्वतःची भविष्यवाणी त्यांनी खरी केली.कन्याकुमारी येथे समुद्रात काही अंतरावर विवेकानंद स्मारक उभारण्यात आलेले आहे.

आज स्वामी विवेकानंद जरी स्थुलरुपात आपल्यात नाहीत तरी ते सुक्ष्म रुपात आपल्याला मार्गदर्शन करायला सतत उपलब्ध आहेत.त्यांचे ग्रंथ,विचार,पुस्तके,कविता,quotes आपल्याला कर्मपथावर अग्रेसर करायला उत्सुक आहेत.गरज आहे ती आपण त्यांना आत्मसात करण्याची.

म्हणूनच,जगभरात विखुरलेल्या मराठी माणसांना जोडणाऱ्या नेटाक्षरीने स्वामीजींना वाहिलेला हा अंक ह्याच उदात्त उद्देशाने प्रकाशित केला आहे.अशा लोकाभिमुख नेटाक्षरीच्या अतिथी संपादकपदाचा बहुमान मला दिल्याबद्दल मी स्वप्नाचे मनःपूर्वक आभार मानतो व ई साहित्य प्रतिष्ठानाला पुढील वाटचालीसाठी हार्दिक शुभेच्छा देतो.स्वामी विवेकानंद हे एक प्रख्यात विचारवंत म्हणून प्रसिध्द पावले पण त्यांनी अनेक मनस्वी व प्रबोधनात्मक सुंदर कविता देखील लिहलेल्या आहेत हे अगदी कमी जणांना माहिती आहे.ह्या अंकातील कवितांसोबतच आम्ही त्यांचे काही सुंदर quotes देखील समाविष्ट केलेले आहेत जे तुम्हाला सकारात्मकरीत्या प्रेरित करतील.

दोस्तांनो,स्वामीजींचे साहित्य व विचार म्हणजे नवचैतन्याचा अविरत प्रवाह आहे.त्या प्रवाहात स्नान करुन आपणही कर्मपथावर चालत राहूयात.स्वामीजींच्या भारत देशाला आजही ‘त्या’ १०० निष्काम तरुणांची गरज आहे.त्यामुळे स्वामी विवेकानंदांच्या पुण्यतिथीनिमित्ताने आपण स्वतःलाच भारत देशाला अर्पण करुन त्यांना श्रध्दांजली देऊयात.त्यांच्या तेजस्वी चरित्रातले जे जे गुण आपल्याला आत्मसात करता येतील ते ते करुयात व भारत मातेची अर्चना करुयात.

ओम नमः श्री यतीराजाय विवेकानंद सुरये
सदचित सुख स्वरुपाय स्वामीणे तापहारिणे

**श्री.कपिल चंद्रायन, नागपूर**
**(अतिथी संपादक)**

BOOKS BY SWAMI VIVEKANANDA

Karma Yoga,Raja Yoga,Vedanta Philosophy:An address before the graduate philosophical society,Lectures from Colombo to Almora,Vedanta philosophy: lectures on Jnana Yoga,Addresses on Bhakti Yoga,Bhakti Yoga,Complete works Vol 5,The East and the West,Inspired Talks, Raja Yoga,Yoga,Narada Bhakti Sutras - translated by Swami Vivekananda, Jnana Yoga, Lectures from Colombo to Almora,Para Bhakti or Supreme Devotion,Practical Vedanta,Speeches and writings of Swami Vivekananda-Acomprehensive collection,Vivekavani,My Master

Swami Vivekananda Rock Memorial,Kanyakumari






## -- अतिथी संपादकाची ओळख --

### श्री.कपिल चंद्रायन

- Economist by Profession
- Visiting Professor in Nagpur & Pune Colleges
- Sr. Research Fellow
  Center for Development Research,Nagpur
- Founder President - Young Initiatives,Nagpur
  (Working in urban water management )
- Runs a support group for pancreatitis Patients
- Studying Vedic Astrology for last 5 years

In a day when you don't come across any problems..you can be sure that you are traveling in the wrong path.

## ....विजय समीप आहे....

असेल जर सूर्य ढगांमागे
अन क्षितीज अंधारलेले
धीर धर रे
वीर हृदया,विजय समीप आहे
    नसे हिवाळा,येई उन्हाळा
    हरेक लाट पोकळ फसवी
    खेळ करी ऊन सावली
    रहा अविचल,बन धीट रे
    वीर हृदया,विजय समीप आहे
जीवन कर्तव्य वेदनादायी
क्षणिक सुख नि ध्येय अंधुकसे
चालत रहा सर्वशक्तिनिशी रे
वीर हृदया,विजय समीप आहे
    ना कर्म व्यर्थ ना झुंज
    जरी नसे आशा ना शक्ती
    होशील तू जगाचा तारणहार
    सत्कर्म व्यर्थ ना जाई रे
    वीर हृदया, विजय समीप आहे
जरी ना होई जीवनी भले तुझे
प्रगतीची फिरतातच चक्रे
होतो उशीर,पण किंमत जगास कळते
ना ऐक कुणाचे,सावकाशीने पुढे चाल रे
वीर हृदया,विजय समीप आहे
दूरदृष्टी असते जयांना
राजे ते शक्तीचे बनतात
    आशिष मिळतो तयांना
    महान ते असती,तयांचे मंगल होते
तयांचे मंगल होते..वीर हृदया,विजय समीप आहे

## ....सुस्वप्न....

बरं वाईट काहीही घडो
चेहऱ्यावर आनंद परतला किंवा दुःखाचा सागर जरी उफाळला
तरी लक्षात घ्या दोस्तांनो,
ते असतं फक्त एक स्वप्न
नियतीच्या रंगमंचावरचा एक खेळ..

एक असा खेळ
की ज्याच्यात आपणा प्रत्येकास एक भूमिका असते
प्रत्येकाला ह्या खेळात हसावे किंवा रडावे लागते
प्रत्येकास आपापली वेषभूषा असते
प्रत्येकाच्या वाट्याला आलटून पालटून ऊन आणि पाऊस येतो

हे सारं एक स्वप्न असतं..एक सुखद स्वप्न
जितकं दूर तितकंच जवळ अन धुक्यात हरवलेलं
ह्याच्या एकमेकांत विरघळलेल्या सीमा इतक्या गडद असतात
की , कठीणतेतही मृदूता भासते

पण, ही काही जादू नसते
कारण..
ह्याचा स्पर्श वाळवंटात जीवन फुलवतो
क्रूर वादळाला सुमधुर गीत बनवतो
मृत्यूसही हरवतो
अन जीवनात गोडवा आणतो

The whole life is a succession of dreams. My ambition is to be a conscious dreamer,that’s all.

## ....शांती....

सावधान....

‘ते’ आपल्या पूर्ण ताकदीनिशी येत आहे
जी शक्ती फक्त शक्ती नाही
तर काळोखातला प्रकाश
अन लकाकती प्रकाशछटा आहे
असा आनंद जो व्यक्त होत नाही
आणि असे दुःख जे पेलवत नाही
असं अमर जीवन जे जगलंच गेलं नाही
अन मृत्यू ज्याचा शोकच केला गेला नाही
जे सुखही नाही अन दुःखही
पण त्यामधले आहे
आजही नाही अन उद्याही
पण त्यांना जोडणारे आहे
जे संगीतातला गोडवा
कलेतला विसावा आहे
जे संवादातलं मौन
आकर्षणातलं बळ आहे
हृदयातली शांतता
कुणीही न पाहिलेलं सौंदर्य आहे
जे अढळ प्रेम
गायले न गेलेले गीत आहे
आणि जे अज्ञात ज्ञान आहे
दोन जन्मातले मरण आहे
दोन वादळातली शांतता आहे
गुलाबाचं जन्मस्थळ
अन जिथे ते परततं ती पोकळीही आहे
तिथे अश्रू परततो हास्य बनून उमलण्यास
हेच तर आहे जीवनध्येय आणि ‘शांती’ त्याचं एकमेव निवासस्थान
ओम शांती शांती शांती....

The powers of the mind are like the rays of the sun
when they are concentrated they illumine.

## ....कप....

हा 'तुझा' कप आहे
तुला सोपवलेला
सुरुवातीपासून....
माझ्या बाळा,मी जाणतो
की,त्यातल्या गडद पेयातले किती तुझे स्वनिर्मित आहे ते
खुप वर्षांपूर्वीच्या तुझ्या चुका अन तुझ्या हावेने तयार केलेले..

माझ्या बालका,अनादि काळापासून मी हे जाणतो..

हाच तुझा मार्ग आहे..कष्टदायक आणि नैराश्याने ग्रासलेला
त्या मार्गावर मी असे दगडरुपी अडथळे पेरले आहेत
जे तुला कधीच विश्रांती घेऊ देणार नाहीत
तुझ्या मित्राला मात्र मी सुखदायक आणि मोकळ्या मार्गावर पाठवलंय
पण तरीही..तरीही तो तुला शरण यायला हवा
माझ्या बालका,तू मात्र ह्या मार्गावरुनच जायला हवेस

हे 'तुझं' कार्य आहे ज्यात आनंद नाही,मानसन्मान नाही
पण हे कुणा सामान्यासाठी नाही
आणि माझ्या ह्या विश्वात मोजक्याच जागा आहेत
घेऊन टाक..
तुला हे सारं कळावंच अशी माझी अपेक्षा नाही
माझं दर्शन करण्यासाठी
तू फक्त डोळे मिट
फक्त डोळे मिट

## ....चल परत जाऊ....

हे माझिया मना,चल पुन्हा परत जाऊ,अपुल्या गावा
भूतलावरल्या ह्या परदेशी
का भटकावे ? दिशाहीनतेने परक्याच्या वेषा ?
ही सजीव नि पंचमहाभूतं
अनोळखी तुजसाठी सारे,नसे एकही तुझे अपुले
का विसरलासी स्वतःस इतुका ?
मूर्ख मना..परक्यांच्या प्रेमा
का विसरलासी स्वहिता ?
        हे माझिया मना..चढ सत्याचे शिखर न थकता
        घेऊनी दीप प्रेमाचा,पथ तुझे उजळाया
        लपव रे प्रवासात स्वगुण
        वाट पहाती रे हाव नि भ्रम
        लुटाया तुझे धन ते बनती लुटारू मार्गावरले
        रक्षण्यास तुजला बाळग जवळ निरंतर
        मनःशांती नि स्वनियंत्रण
हे माझिया मना,सहवास थोरांचा असेल तुजसाठी
करेल स्वागत विश्रामगृह वाटेवरी
दे आराम थकलेल्या देहा,पुढे जातांना
पण, आली जर तुज कधीही शंका चौकीदाराची तिथल्या
प्रवासात जर कशानेही भिववले तुजला
स्मर प्रभूला....
        राजा असे तो त्या पथाचा
        मृत्यूही करी सलाम ज्याला
माझिया मना, स्मर प्रभूला
मृत्यूही करी सलाम त्याला

Whatever you think that you will be.If you think yourself weak,weak you will be.If you think yourself strong,strong you will be.

# ….समाधी गीत….

मावळे सूर्य , विझे चंद्र
लोपे प्रकाश रिक्त अवकाशी
तरंगे सावली जगाची

रिक्त मनाची पोकळी
तरंगे त्यात पृथ्वी , उगवे अन वाहे
वर्तमानातल्या ‘मी’त , पुन्हा अनंतात बुडे

अलवार सावली गुणित होई
प्रवेशे गर्भात , तरंगे अनंतात
फक्त मी , ‘मी’च उरे वर्तमानात

काल थबके , वर्तमानात ना काही
शब्दं अन मना पल्याड , रिक्तात रिक्त सामावे
जे हृदय हे समजे,तेच जाणे तेच उमजे

Be a Hero. Always say, “I have no fear.”



# नेटाक्षरी

मराठी साहित्य रसिकांना नेहमी उत्तमोत्तम व नाविन्यपूर्ण साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे.दरवेळी ईमेलने येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतो.ह्याच प्रोत्साहनाच्या बळावर नेटाक्षरीने मागील महिन्यातच आपला शतकोत्सव साजरा केला.हा अंक सध्या सुमारे ८५००० रसिकांना ईमेलने मोफत वितरीत केला जातोय.सोबतच मागील सर्व प्रकाशित अंक वाचण्यासाठी www.esahity.com ह्या आमच्या संकेतस्थळाला भेट देणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हे अंक तुम्ही आपल्या फ्रेंडलिस्टला Fwd करुन त्यांनाही ह्या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे हा आमचा प्रेमळ आग्रह.त्याच ईमेलची CC netaksharee@gmail.com वर आम्हाला दिल्यास पुढील अंक आम्ही त्यांना नियमित पाठवत राहू.मराठी भाषेची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यास आपला हातभार लागावा असे कुठल्या मराठी भाषिकास नाही वाटणार ?
ह्याच विश्वासाच्या बळावर आपल्यासारख्या दर्दी रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचाही पल्ला पार करील अशी आम्हांला खात्री आहे.

*आमची इतर ई प्रकाशने –*

विनोदाचा दादा-ई स्टॉप,कवितांचा आवाज-स्वर नेटाक्षरी,मुलांचा नेट प्रवेश-बाल नेटाक्षरी,महाराष्ट्राचं वैभव-दुर्ग दुर्गट भारी

*आमची प्रकाशित ई पुस्तके –*

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान,ई शाळा,
तो मी आणि सिगरेट,मोरया,लोकल गोष्टी,मीरा(मराठी अनुवाद),ओथंब,सावळया मुलीची गाणी,सईची वही,लालनाक्या,एक होते राजे

वरील ई पुस्तके मोफत मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रिया,स्वलिखित साहित्य पाठवण्यासाठी – www.esahity.com

नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com

ई साहित्यची सर्व प्रकाशने cd मध्ये देखील उपलब्ध आहेत संपर्क करा – ९८६९६७४८२०